**महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांना अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**

**शासन शुद्धीपत्रक क्रमांकः बीयुडी-२०१५/प्र.क्र.२३५/ऊर्जा-७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: २८ ऑगस्ट, २०१५.

वाचा:-

१) शासन निर्णय उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग बीयुडी-२०१५/प्र.क्र.२३५/ऊर्जा-७,दि. २४ जून, २०१५.

२) शासन निर्णय उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग बीयुडी-२०१५/प्र.क्र.२३५/ऊर्जा-७,दि. २१ जुलै, २०१५ चे शुद्धीपत्रक.

३) वित्त विभागाचे महाराष्ट्र विनियोजन विधेयक,२०१५ चे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/ अर्थ-३, दि. १७.४.२०१५.

४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्रशा.५,दि. २४.७.२०१५.

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या दिनांक १७.४.२०१५ च्या शासन परिपत्रकास अनुसरुन महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांना अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी अनुदान वितरीत करण्याबाबतचा शासन निर्णय समक्रमांकाच्या दिनांक २४.६.२०१५ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला व त्यानुसार कोषागार कार्यालयात देयक सादर करण्यात आले.

यासंदर्भातील देयक पारीत करताना कोषागार कार्यालयाने सदर प्रकरणी वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक १७.४.२०१५ व २४.६.२०१५ मधील तरतूदींची पूर्तता होत असल्याबाबत स्पष्टपणे शासन निर्णयात नमूद करुन देयक फेरसादर करावे असे कळविले आहे.

त्यास अनुसरुन वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकातील अटींची पूर्तता होत असल्याबाबत शासन निर्णयात नमूद करुन सुधारणेसह शुद्धीपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

**शुद्धीपत्रक:-**

वाचा क्र.१ येथील या विभागाच्या शासन निर्णयामधील परि.क्र.८ मध्ये सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१७ एप्रिल,२०१५ च्या शासन परिपत्रकास अनुसरुन काढण्यात येत आहे. ज्यानुसार सदर निधी या विभागाच्या अधिकार कक्षेत वितरीत करण्यात येत असून त्यास नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेची आवश्यकता नसल्याबाबत वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकात नमूद केले आहे असे नमूद करण्यात आले होते. तथापि, अधिदान व लेखा

अधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयाने दिलेल्या निदेशास अनुसरुन व वित्त विभागाच्या उपरोक्त सं.क्र.३ व ४ मधील परिपत्रकांना अनुसरुन सं.क्र.१ मधील शासन निर्णयातील परि.क्र.८ खालीलप्रमाणे वाचण्यात यावा:-

महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१५ परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.४.२०१५ च्या परिशिष्टामधील अ.क्र.३ व ९ मधील तपासणी सूचीमधील अटींची, शासन निर्णय परि.क्र.७ ते १८ मधील प्रत्येक अटीची तसेच वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/ कोषा.प्रशा.५, दिनांक २४.७.२०१५ च्या परिशिष्टामधील अ.क्र.३ व ९ मधील अटींची पूर्तता महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांना अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी अनुदान वितरीत करताना होत आहे.

सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२८१५३३४५८२१० असा आहे. हे शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Parkar
Suryakant V

Digitally signed by Parkar Suryakant V
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Parkar Suryakant V
Date: 2015.08.28 15:37:38 +05'30'

**( सु.व.पारकर )**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर.
४. अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. वित्त विभाग,व्यय-१६ / अर्थसंकल्प-३,मंत्रालय,मुंबई-३२.
६. नियोजन विभाग,का-१४६१, मंत्रालय,मुंबई-३२.
७. आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
८. अवर सचिव (रोख शाखा/प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती, ऊर्जा-७, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.